पोलीस अधीक्षक, अमरावती ग्रामीण यांचे अधीनस्त सरमसपुरा पोलीस ठाण्यातील मंजूर राखीव पोलीस उपनिरीक्षक-२ पदांऐवजी पोलीस उपनिरीक्षक-२ पदे मंजूर करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-२३१४/११९९/प्र. क्र. १०३/पोल-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: ७ नोव्हेंबर, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांकः अेपीओ-३१०९/८३६/प्र. क्र. ३४०/पोल-३, दि.३१.१२.२००९.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ४१/अर्थ-१, दि.२.६.२०१५.

३) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.) यांचे पत्र क्र. पोमसं/२६-अ/४७/अमरावती ग्रा/२२१/२०१५, दि.१६.९.२०१५.

**प्रस्तावना :**

गृह विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ वरील दि.३१.१२.२००९ च्या शासन निर्णयान्वये पोलीस अधीक्षक, अमरावती ग्रामीण यांचे अधीनस्त अचलपुर पोलीस ठाण्याचे विभाजन करुन सरमसपुरा पोलीस चौकीचे रुपांतर पोलीस ठाण्यामध्ये करण्यात आले होते. त्यानुसार सरमसपुरा पोलीस ठाण्याकरीता खालीलप्रमाणे पदनिर्मिती करण्यात आली होती.

| पोलीस निरीक्षक | सहाय्यक पोलीस निरीक्षक | पोलीस उपनिरीक्षक | राखीव पोलीस उपनिरीक्षक | सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक | पोलीस हवालदार | पोलीस नाईक | पोलीस शिपाई | चालक पोलीस शिपाई | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | २ | २ | २ | १० | ८ | २४ | २ | ५२ |

अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय, मुंबई यांनी संदर्भाधीन क्र. ३ वरील दि.१६.९.२०१५ चे पत्रान्वये, उपरोक्तप्रमाणे निर्माण केलेल्या दोन राखीव पोलीस उपनिरीक्षक ऐवजी दोन पोलीस उपनिरीक्षक ची पदे मंजूर करणेबाबत विनंती केली होती.

**शासन निर्णय:**

वित्त विभागाने संदर्भाधीन क्र. २ वरील दि.२.६.२०१५ चे शासन निर्णयान्वये, प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरीत परिणाम न होता, विभागामध्ये एकूण उपलब्ध कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याचे संपुर्ण अधिकार दिले आहेत. सदरहू समायोजन एकूण पदसंख्येच्या मर्यादेमध्ये आणि समान वेतनश्रेणीतील पदांमध्ये करता येणार आहे.

२. पोलीस अधीक्षक, अमरावती ग्रामीण यांचे अधीनस्त सरमसपुरा पोलीस ठाण्यासाठी संदर्भाधीन क्र. १ वरील शासन निर्णयानुसार निर्माण केलेल्या राखीव पोलीस उपनिरीक्षक-२ पदे (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००+ ग्रेड पे ४३००/-) ऐवजी पोलीस उपनिरीक्षक-२ पदे (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००+ ग्रेड पे ४३००/-) निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ४१/अर्थ-१, दि.२.६.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०७१५३१४८४१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.11.07 15:39:04 +05'30'

**(द. ह. कदम)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, अमरावती विभाग, अमरावती
४) पोलीस अधीक्षक, अमरावती ग्रामीण
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८) वित्त विभाग (अर्थ-१), मंत्रालय, मुंबई-३२
९) निवडनस्ती,पोल-३.